**दिग्रस को. प. बंधारा, ता. देऊळगांवराजा, जि. बुलढाणा या योजनेस प्रथम सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करणेबाबत.**

महाराष्ट्र शासन
जलसंपदा विभाग
**शासन निर्णय क्रमांकः लपात २२१२( प्र क्र २७५/२०१२)/लपा-२**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
तारीखः ५ फेब्रूवारी, २०१५.

पहावे

**१) कार्यकारी संचालक, विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ यांचे पत्र क्र. ४११३/विपाविम/कातां ७ , दि. ०४.०५.२०१२.**

**२) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२ यांचे पत्र क्रमांक व्ययस-२०१४/प्रक्र१९९/अर्थ-२ दिनांक १ जानेवारी, २०१५.**

प्रस्तावना

शासन निर्णय क्र. कोपबं/२२०५/(३९१/२००५)/लपा-२, दिनांक ०९.०६.२००६ अन्वये रुपये रु. २३२.३८५ लक्ष रकमेस प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली होती. हा प्रशासकीय मान्यतेचा प्रस्ताव तयार करतांना सन २००३-२००४ च्या दरसूचीप्रमाणे दर वापरण्यात आले होते. मध्यंतरीच्या काळात योजनेच्या खर्चात दरसूचीतील फरकामुळे, भूसंपादन किंमतीतील झालेली वाढ, संकल्पचित्रातील बदल इत्यादी कारणांमुळे वाढ होत असल्यामुळे योजनेस सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करणे आवश्यक झाले आहे.

**शासन निर्णय**

आता या शासन निर्णयान्वये दिग्रस को. प. बंधारा, ता. देऊळगांवराजा, जि. बुलढाणा या योजनेचा एकूण अंदाजीत खर्च रुपये ६५९.५२३ लक्ष (रु. सहा कोटी, एकोणसाठ लक्ष, बावन्न हजार, तीनशे फक्त) या किंमतीस प्रथम सुधारीत प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे. कामासाठीची एकूण तरतूद रूपये ५९९.९५३ लक्ष (रू. पाच कोटी, नव्याण्णव लक्ष, पंच्च्यांण्णव हजार तीनशे फक्त) व अनुषंगीक खर्चासाठीची एकूण तरतूद रूपये ५९.५७० लक्ष (रू. एकोणसाठ लक्ष, सत्तावन्न हजार फक्त) आहे. अंदाजपत्रकात उर्वरित कामासाठी सन २०११-२०१२ या वर्षाच्या दरसूचीप्रमाणे दर वापरण्यात आले आहेत. उपशिर्षवार तरतुदींचा गोषवारा सोबत परिशिष्टामध्ये जोडला आहे.

व्यय अग्रक्रम समितीच्या दिनांक २१ ऑगस्ट, २०१४ रोजी झालेल्या बैठकीच्या इतिवृत्तात नमुद केल्यानुसार “सन २०१५-१६ या आर्थिक वर्षात या प्रकल्पासाठी तरतूद उपलब्ध करून दिली जाणार नाही. तत्पूर्वी काम पूर्ण करावे.” या अटीच्या अधीन राहून सुधारित प्रशासकीय मान्यतेचा निर्णय निर्गमीत करण्यात येत आहे.

या योजनेच्या कामावरील खर्च मागणी क्र. आय-५,"४७०२ लहान पाटबंधारे यावरील भांडवली खर्च ८०-सर्वसाधारण १९०, सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणूका (००) (०५) विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळाला भाग भांडवली अंशदान, (४७०२ ५१०१)" या लेखाशिर्षाखाली खर्ची घालावा व शासनाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

हा शासन निर्णय, नियोजन विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र. ७/१४३४, दि. ०५.०७.२०१४ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार तसेच व्यय अग्रक्रम समितीने दि. २१ ऑगस्ट, २०१४ रोजी संपन्न झालेल्या बैठकीत दिलेल्या मंजुरीनुसार व संदर्भ क्रमांक २ नुसार याबाबतच्या निर्गमीत केलेल्या इतिवृत्तानुसार निर्गमीत करण्यात येत आहे.

या योजनेस प्रदान करण्यात आलेली सुधारित प्रशासकिय मान्यता (७८/२०१५) अनुक्रमांकावर नोंदण्यात आली आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०२१२१५४०३८२७२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Rajendra Baburao Kshirsagar

Digitally signed by Rajendra Baburao Kshirsagar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Rajendra Baburao Kshirsagar
Date: 2015.02.12 15:49:43 +05'30'

(रा. बा. क्षीरसागर)
शासनाचे अवर सचिव

सहपत्र-परिशिष्ट अ

प्रत,

१. महालेखापाल, महाराष्ट्र राज्य (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/नागपूर.
२. महालेखापाल, महाराष्ट्र राज्य (लेखा परिक्षा), मुंबई/नागपूर.

३. वित्त विभाग (व्यय-१२), मंत्रालय, मुंबई ३२
४. नियोजन विभाग (कार्यासन १४३४), मंत्रालय, मुंबई ३२.
५. कार्यकारी संचालक, विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ, नागपूर.
६. मुख्य अभियंता, विशेष प्रकल्प जलसंपदा विभाग, अमरावती.
(सोबत सुधारित प्रशासकीय मान्यतेची परिनिरीक्षण टिप्पणी जोडली आहे)
७. आंतर वित्त सल्लागार व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. जिल्हाधिकारी, बुलढाणा.
९. अधीक्षक अभियंता, अकोला पाटबंधारे मंडळ, अकोला.
१०.कार्यकारी अभियंता, बुलढाणा पाटबंधारे विभाग, बुलढाणा.
११.अर्थशाखा १/२ (२ प्रती), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
१२.लपा-१ (२ प्रती), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
१३.विभागीय संपर्क अधिकारी, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई.
(२ प्रती)
१४.लपा-२, संग्रहार्थ.

## परिशिष्ट अ

## शासन निर्णय क्रमांक : लपात २२१२/(प्र.क्र.२७५/२०१२)/लपा-२, दि. ०५.०२.२०१५

## दिग्रस को. प. बंधारा, ता. देऊळगांवराजा, जि. बुलढाणा

## उपशिर्षनिहाय तरतूदी

| क्र. | उपशिर्ष | रक्कम (लक्ष) |
|---|---|---|
| १ | ए - प्राथमिक | ०.५०० |
| २ | बी - भुसंपादन | ४.३०० |
| ३ | सी - मुख्य कामे | ५६०.३४६ |
| ४ | के - इमारती | ३.००० |
| ५ | ओ - संकिर्ण | ५.६०० |
| ६ | पी - देखभाल | ११.२०७ |
| ७ | आर - दळणवळण | १५.०० |
| | **एकुण** | **५९९.९५३** |
| | **आनुषंगिक खर्च** | **५९.५७०** |
| | **योजनेची एकूण किंमत (रु.लक्ष)** | **६५९.५२३** |

**ठळक बाबी**

अ) या योजनेचे सिंचन क्षेत्र ६०६ हेक्टर आहे.

ब) या योजनेमुळे एकूण होणारा पाणीसाठा १८८६.३५ सघमी. आहे.

क) प्रति सहस्त्र घनमीटर पाणीसाठा किंमत रु. ३४९६३/-

ड) लाभव्यय गुणोत्तर १.५९ > १